**उपसंचालक आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर यांच्या अंतर्गत जी.एन.एम.नर्सिंग स्कूल, जिल्हा रुग्णालय, रत्नागिरी येथील २६ अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अपदे-२०२५/प्र.क्र. १०७/पासु-२**
१० वा मजला, संकुल इमारत,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मंत्रालय, मुंबई
तारीख: २८ मे, २०२५

**वाचा:-**

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.अपदे-२०२४/प्र.क्र.३००/आरोग्य-४, दिनांक ०१.०९.२०२४.
२) उपसंचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर यांचा प्रस्ताव क्र.उसंआसेको/आस्था/कक्ष-३अ/अस्थायी पदे मुदतवाढ/२०२५-२६/४८३२-३३/२०२५, दिनांक २८.०२.२०२५.
३) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ०३.०३.२०२५.

**प्रस्तावना :-**

उपसंचालक आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर यांच्या अंतर्गत जी.एन.एम.नर्सिंग स्कूल, जिल्हा रुग्णालय, रत्नागिरी येथील २६ अस्थायी पदांची मुदतवाढ संपुष्टात आल्याने व यापुढेही या पदांची आवश्यकता असल्याने सदर पदांना दिनांक ०१.०३.२०२५ ते दिनांक ३१.०८.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त वाचा येथील क्र. २ अन्वये उपसंचालक आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर यांच्या अंतर्गत जी.एन.एम.नर्सिंग स्कूल, जिल्हा रुग्णालय, रत्नागिरी येथील २६ अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबतचा प्रस्ताव सादर करण्यात आला आहे.

२. या शासन निर्णयासोबत जोडलेल्या “परिशिष्ट-अ” मध्ये नमूद करण्यात आलेल्या जी.एन.एम.नर्सिंग स्कूल, जिल्हा रुग्णालय, रत्नागिरी येथील २६ अस्थायी पदांना दिनांक ०१.०३.२०२५ ते दिनांक ३१.०८.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

३. सदर अस्थायी पदांचे वेतन पुढील लेखाशिर्षामध्ये खर्ची टाकण्यात यावे आणि हा खर्च सन २०२५-२६ या वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

| अ.क्र. | लेखाशिर्ष |
|---|---|
| १ | मागणी क्रमांक आर-१ मुख्य लेखाशिर्ष "२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, (०६)-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- राज्य योजनांतर्गत योजना, (०६) (०१) मुफसल क्षेत्रातील अध्यापनेत्तर शासकीय रुग्णालये व दवाखाने (२२१० ०२२६)" |

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ०३.०३.२०२५ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे. सदर पदे व्यपगत झाले नसल्याची खात्री करण्यात आली आहे.

५. सदर पदांना यापुढील कालावधीकरीता मुदतवाढ देण्याबाबतचा प्रस्ताव सादर करताना या सोबतच्या "परिशिष्ट-अ" मधील तक्त्यात प्रत्येक आरोग्य संस्थेचे नाव, एकूण मंजूर पदे, स्थायी पदे व अस्थायी पदे (तपशिलवार माहिती) याबाबतच्या माहितीसह शासनास सादर करण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०५२८१४२७४६४७१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MAHESH MADHUKAR LAD

Digitally signed by MAHESH MADHUKAR LAD
DN: cn=MAHESH MADHUKAR LAD, o, ou, email=mahesh.lad@nic.in, c=US
Date: 2025.05.28 14:55:58 +05'30'

( महेश लाड )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये (राज्यस्तर), मुंबई.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर.
६. जिल्हा शल्यचिकित्सक, जिल्हा रूग्णालय, रत्नागिरी.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी.
८. वित्त विभाग ( कार्यासन /व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.
९. निवडनस्ती ( आरोग्य-४ ), सा.आ.वि.

# “परिशिष्ट-अ”

(शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.अपदे-२०२५/प्र.क्र.१०७/पासु-२,
दिनांक २८.०५.२०२५ सोबतचे विवरणपत्र)

| अ.क्र. | आरोग्य संस्थेचे नाव | एकूण मंजूर पदे | स्थायी पदे | अस्थायी पदे |
|---|---|---|---|---|
| १ | जी.एन.एम.नर्सिंग स्कूल, जिल्हा रुग्णालय, रत्नागिरी | २६ | ०० | प्राचार्य, गट-क (१ पद)<br>उप प्राचार्य, गट-क (१ पद)<br>पाठयनिर्देशक, गट-क (१४ पदे)<br>लघुटंकलेखक, गट-क (१ पद)<br>लिपिक, गट-क (१ पद)<br>ग्रंथपाल, गट-क (१ पद)<br>प्रयोगशाळा सहाय्यक, गट-क (१ पद)<br>गृहपाल/ वार्डन, गट-क (३ पदे)<br>शिपाई, वर्ग-४ (३ पदे)<br>**एकूण २६ पदे** |